**कोकण विकास कार्यक्रम - २००९ अंतर्गत सिंधुदूर्ग येथे मच्छिंद्र कांबळी नाट्यगृह इमारतीचे बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नागृबा-२०१०/प्र.क्र.२४७/सां.का.१**
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११ मार्च, २०२४

**वाचा :**

१) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : नागृबा-२०१५/प्र.क्र.८५/ सां.का.१, दिनांक २९.०२.२०१६.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : नागृबा-२०१०/प्र.क्र.२४७/ सां.का.१, दिनांक २१.३.२०११.
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय - क्र. नागृबा-२०१०/प्र.क्र.२४७/ सां.का.१, दिनांक ११.७.२०१८.

**प्रस्तावना :**

नियोजन विभागाच्या दिनांक २५.८.२००९ च्या शासन निर्णयान्वये कोकण विकास कार्यक्रम-२००९ जाहीर करण्यात आला. सदर शासन निर्णयातील मुद्दा क्र. ४० नुसार ओरोस येथील रंगकर्मी मच्छिंद्र कांबळी नाट्यगृह विकसित करण्याबाबतची योजना मान्य करण्यात आली. जिल्हा पातळीवर बंदिस्त नाट्यगृह बांधकामास मंजूरी देण्याची योजना उपर्निर्दिष्ट दि.२९.०२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित आहे. या योजनेनुसार महानगरपालिका "अ", "ब" व "क" वर्ग नगरपालिका या क्षेत्रात जिल्हा मुख्यालयी बंदिस्त नाट्यगृह उभारण्यासाठी अनुदान देण्यात येते. त्यानुसार ₹ ३,३७,७१,२७६/- इतक्या अंदाजित किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र २ अन्वये ₹ ३,२०,८२,७१२/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. प्रचलित धोरणानुसार ₹ ३.८० कोटी इतक्या रकमेच्या मर्यादेत ५०:४०:१० या प्रमाणात निधी वाटप करण्यात आला आहे. मात्र, ७ वर्षाच्या कालावधीमध्ये देखील नाट्यगृहाचे बांधकाम अपूर्ण असल्याने आणि मुळ अंदाजपत्रकामध्ये ₹ ९,२५,०७,६७९/- इतक्या रकमेची झालेली बाढ पाहता, जिल्हाधिकारी, कुडाळ यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे एकूण ₹ १२,४५,९०,३९१/- इतक्या एकूण रकमेस एक विशेष बाब म्हणून प्रशासकीय मान्यता संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आली. तथापि, कुडाळ ही नगरपंचायत असल्याने आणि त्यांच्या हिश्याची रक्कम देण्यास सक्षम नसल्यामुळे अद्याप सदरच्या नाट्यगृहाचे बांधकाम पूर्ण झालेले नाही. सबब, नाट्यगृहाच्या बांधकामाच्या उर्वरित कामास ₹ ८,६६,००,०००/- इतका निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

नियोजन विभागाच्या दिनांक २५.८.२००९ च्या शासन निर्णयान्वये कोकण विकास कार्यक्रम-२००९ जाहीर करण्यात आलेल्या कार्यक्रमांतर्गत संदर्भ २ व ३ येथील शासन निर्णयान्वये ₹ १२,४५,९०,३९१/- खालीलप्रमाणे

सुधारणा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात येत असून, शासन निर्णयातील उर्वरित बाबी लागू राहतील :-

- नाट्यगृह बांधकामाची अंदाजित रक्कम - ₹१२,४५,९०,३९१/-
- प्रचलित धोरणानुसार ९५% च्या मर्यादेत (शासन हिस्सा) - ₹११,८३,६०,८७१/-
- त्यापैकी पहिला हप्ता - ₹०५,९१,८०,४३६/-
- दुसरा हप्ता - ₹०४,७३,४४,३४८/-
- तिसरा हप्ता - ₹०१,१८,३६,०८७/-

दिनांक ११.०७.२०१८ च्या शासन निर्णयातील उर्वरित बाबी कायम राहतील.

०२. सदर नाट्यगृह बांधकामासाठी सादर करण्यात आलेल्या अंदाजित किंमतीत बांधकाम पूर्ण करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी कार्यालयाची राहील.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३१११०३७४५२९२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GOPICHAND PANDURANG CHAVAN

Digitally signed by GOPICHAND PANDURANG CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT,
2.5.4.20=2f36b6412b2bad225b8d078a7f80eed5b7d004f917946ac3d5ff416ac9473d48, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=0E195B995C4CFBA1B7E199D1B4B48F8A7C4C1AAD3E82FED8E020632824893159, cn=GOPICHAND PANDURANG CHAVAN
Date: 2024.03.29 15:44:23 +05'30'

**( गो. पां. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४) सर्व सन्माननीय विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
५) जिल्हाधिकारी, जिल्हा सिंधुदुर्ग
६) जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- एक, महाराष्ट्र, मुंबई.
८) महालेखापाल (लेखा परीक्षा)- एक, महाराष्ट्र, मुंबई.
९) नियोजन विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) वित्त विभाग (व्यय-१५) मंत्रालय, मुंबई.
११) मा. मंत्री, वित्त यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२) मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
१३) अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती, सां.का.१